सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी "महिलांकरिता समुपदेशन केंद्रे" या योजनेसाठी निधी वितरित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक- समुप-२०२२/प्र.क्र.६१/का-१०**

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- २० मार्च, २०२३.

संदर्भ :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.४.४.२०२२ व दि. ८.२.२०२३.
२. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.समुप-२०२२/प्र.क्र.६१/का-१०, दि.२६.५.२०२२ व दि.११.१०.२०२२.

शासन निर्णय :-

महिला व बालकांवर होणाऱ्या अत्याचारांना प्रतिबंध करण्यासाठी पोलीस स्टेशनच्या आवारात स्थापन करण्यात आलेल्या महिला समुपदेशन केंद्रातील कार्यरत समन्वयक व समुपदेशक यांचे मानधनावरील खर्चासाठी विवरणपत्रातील रकाना क्रमांक (२) मधील लेखाशीर्ष/उद्दिष्टाकरिता रकाना क्रमांक (५) प्रमाणे एकूण **₹५५.०० लक्ष (अक्षरी रुपये पंचावन्न लक्ष फक्त)** इतका निधी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांना वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**(रुपये लक्ष)**

| अ.क्र. | प्रधान/ लेखाशिर्ष / संगणक सांकेतांक/ उद्दिष्ट | विद्यमान तरतूद | यापूर्वी वितरीत निधी | प्रस्तावित वितरण |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | मागणी क्र.एक्स-१,<br>२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण,<br>०२, समाजकल्याण,<br>१०३, महिला कल्याण,<br>(२१) महिलांकरिता समुपदेशन केंद्रे,<br>(२१) (०१) महिलांकरिता समुपदेशन केंद्रे (कार्यक्रम),<br>(२२३५ ३१७७),<br>३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | **३८५.००** | **३२८.००** | **५५.००** |

२. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास व शासनास सादर करण्याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी घ्यावी.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील दि.४.४.२०२२ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेला निधी चालू वित्तीय वर्षात खर्च करण्याची तसेच अखर्चित राहणारा निधी दि.३१.३.२०२३ पूर्वी समर्पित करण्याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी घ्यावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.७४/व्यय-६, दि.१५.३.२०२३ अन्वये त्या विभागांनी दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२०१६३२०३०९३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAHEBRAO
DHANRAJ BHOYE

Digitally signed by SAHEBRAO DHANRAJ BHOYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=201303bc41ec1fa4d14ccef33019b230317b039f951887dd25d72febda91bf82, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9F3A08DCEC2321C344A1916033CF8C938EFBE80C42926638012D340624F73C19, cn=SAHEBRAO DHANRAJ BHOYE
Date: 2023.03.20 16:36:32 +05'30'

**( साहेबराव भोये )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती, का-१०.